जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य/यांत्रिकी/विद्युत व यांत्रिकी) यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
**शासन परिपत्रक क्रमांकः परिवी २०१६/(प्र.क्र.१७५ /२०१६)/आ(स.अ.श्रेणी-२)**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : २९/११/२०१६**

**वाचा :-**

सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्रमांक : परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि.२९/०२/२०१६

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ या गट-ब राजपत्रित पदावर २ वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी स्थापत्य/यांत्रिकी/विद्युत व यांत्रिकी या संवर्गातील अभियंत्यांची नेमणूक करण्यात येते. दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या समाप्त केल्यानंतर त्यांचे गोपनीय अहवाल व इतर आवश्यक अर्हता विचारात घेऊन परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत शासन स्तरावरुन ज्ञापन निर्गमित करण्यात येते. सदर परिवीक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत संदर्भाधिन शासन निर्णयान्वये सर्वसमावेशक सूचना देण्यात आलेल्या आहेत.परिवीक्षाधीन अभियंत्यांनी परिवीक्षाधीन कालावधीत आवश्यक अहर्ता प्राप्त न केल्यास परिवीक्षाधीन कालावधी जास्तीत जास्त १ वर्षापर्यंत वाढविण्याबाबत शासनास अधिकार आहेत. वाढीव कालावधीमध्ये आवश्यक अर्हता प्राप्त न केल्यास सदर अभियंत्यांच्या सेवा समाप्त करण्याची तरतूद आहे. त्यामुळे परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याचे प्रस्ताव विहित नमुन्यात व वेळेत शासनास सादर होणे आवश्यक आहे. तथापि असे निदर्शनास आले आहे की, क्षेत्रिय स्तरावरुन परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत दूर्लक्ष केले जाते व विहीत कालावधी उलटून गेल्यानंतर कित्येक वर्षानंतर उशीरा असे प्रस्ताव शासनास प्राप्त होतात. या दरम्यान सदर अभियंत्याचा पुढील पदोन्नतीसाठी विचार केला जात नाही. यास्तव परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याच्या प्रस्तावाबाबत पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

**शासन परिपत्रक**

**१)** सहायक अभियंता (स्थापत्य/यांत्रिकी/विद्युत व यांत्रिकी) श्रेणी-२ या अभियंत्यांची नियुक्ती झाल्यानंतर २ वर्षाच्या कालावधीनंतर त्यांच्या रजा (नैमित्तीक रजा वगळून) विचारात घेऊन परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबतचा प्रस्ताव १५ दिवसात शासनास सादर करावा.

२) दोन वर्षाच्या कालावधीमध्ये संबंधित सहायक अभियंता श्रेणी-२ याने व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण केली नसल्यास त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी अपवादात्मक परिस्थीतीत कमाल १ वर्षाने वाढवून त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबतचा प्रस्ताव ३ वर्षानंतर विहीत विवरणपत्रात(प्रत सोबत जोडली आहे) शासनास सादर करावा.

३) विहीत कालावधीमध्ये अभियंत्यांनी हिंदी भाषा परीक्षा, मराठी भाषा परीक्षा व संगणक अर्हता इ. सर्व प्राप्त केल्या आहेत याची खात्री करावी.

४) परिवीक्षा कालावधी समाप्त करण्याचा प्रस्ताव शासनास सादर करताना खालील कागदपत्रांच्या प्रती कार्यालय प्रमुखाने साक्षांकित करुन विहीत विवरणपत्रासह शासनास सादर कराव्यात :-

- संबंधीतांचे नियुक्ती आदेश,
- भाषा परीक्षा उत्तीर्ण / सूट मिळाल्याबाबतचे आदेश,
- रजेबाबतचे आदेश,
- व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण/सूट मिळाल्याबाबतचे आदेश,
- संगणक अर्हता,
- जात वैधता प्रमाणपत्र ( लागू असल्यास ),
- स्वयंमूल्यनिर्धारण अहवाल
- गोपनीय अहवाल
- सेवा पुस्तकातील जन्म तारखेच्या,नियुक्तीच्या,जात वैधता प्रमाणपत्राच्या,वैद्यकिय अहवालाच्या इ.आवश्यक नोंदी असलेल्या पृष्ठांच्या सुस्पष्ट प्रती.
- संबंधीतांची विभागीय चौकशी चालू/प्रस्तावीत आहे किंवा कसे याबाबतचे प्रमाणपत्र.
- संबंधीतांवर फौजदारी/लाललुचपत प्रतिबंधक कायद्यांतर्गत गुन्हा दाखल आहे किंवा कसे तसेच न्यायालयीन प्रकरण प्रलंबीत असल्यास त्याबाबत प्रमाणपत्र सादर करावे.

परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबतचा प्रस्ताव विहीत नमुन्यात आवश्यक कागदपत्रांसह व विहीत कालावधीत सादर करण्याची दक्षता कार्यालय प्रमुखानी घ्यावी. परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत वेळेत प्रस्ताव सादर न झाल्यामुळे काही न्यायालयीन प्रकरणे उद्भवल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखांची राहील याची नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२९१५०९२५५२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Popat Gangaram Tande

Digitally signed by Popat Gangaram Tande
DN: CN = Popat Gangaram Tande, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2016.11.29 15:13:48 +05'30'

**सोबत-विवरणपत्र**

**(पो.गं.तंडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

१) प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प विभाग)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वयक), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
३) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
४) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
५) स.स.(सेवा)/उस(प्रशा)/उ.स.(आस्था),जलसंपदा विभाग.
६) अ.स.(संनि)/अस(प्रशा)/अ.स.(सेवा),/अ.स.(आस्था),जलसंपदा विभाग.
७) क.अ.(गोपनीय कार्यसन)
८) निवडनस्ती आ(स.अ.श्रेणी-२)

जलसंपदा विभाग शासन परिपत्रक क्रमांकः परिवि २०१६/(प्र.क्र.१७५/२०१६)/आ(स.अ.श्रेणी-२), दि.२९/११/२०१६.सोबतचे विवरणपत्र.

| अक्र | नाव (सर्वश्री) | नियुक्ती प्रवर्ग | जात प्रमाणपत्र तपासणी अहवाल | नियुक्तीचा दिनांक | रुजु झाल्याचा दिनांक | व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण/ सूट | व्यावसायिक परीक्षेचा कालावधी | रजा कालावधी (दिवस) | संगणक अर्हता प्राप्त | मराठी/ हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण/ सूट | विभागीय चौकशी चालू/ प्रस्तावित / प्रलंबीत | न्यायाल यीन चौकशी चालू/ प्रस्तावित /प्रलंबीत | स्वयं मूल्यांकन अहवाल प्रतवारी | परिवीक्षा कालावधी समाप्तीचा प्रस्तावित दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ |
| | | | | | | | | | | | | | | |

************************